**सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरीता वनेतर क्षेत्रातील पाणथळे, सरोवरे इत्यादी ठिकाणच्या जैव विविधतेचे व्यवस्थापन (२४०६ २२९५) लेखाशीर्षांतर्गत उर्वरित अनुदान वितरण करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः साववि-२०१६/प्र.क्र.५३/फ-११**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

**दिनांक : २३ मार्च, २०१७**

वाचा :-

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.साववि-२०१६/प्र.क्र.५३/फ-११, दिनांक ०७.०५.२०१६

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१७/प्र.क.८९ /अर्थ-३, दि.०८.०२.२०१७

३) प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, पुणे, यांचे पत्र क्र.कक्ष-१/योजना/प्र.क्र.०७/१६-१७/२७६९/१६-१७, दि.१०.०३.२०१७

प्रस्तावना :-

सामाजिक वनीकरणाचे महत्व लक्षात घेऊन वृक्ष लागवड व संवर्धन करण्याकरीता सामाजिक वनीकरणांतर्गत **"वनेतर क्षेत्रातील पाणथळे, सरोवरे इत्यादी ठिकाणच्या जैव विविधतेचे व्यवस्थापन"** या योजनेसाठी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.साववि-२०१६/प्र.क्र.५३/फ-११, दि.०७.०५.२०१६नुसार रु.१२०.००लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. आता उर्वरित रु.३०.००लक्ष इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

सन २०१६-१७ या वित्तीय वर्षात सामाजिक वनीकरण विभागांमार्फत राबविण्यात येणाऱ्या **"वनेतर क्षेत्रातील पाणथळे, सरोवरे इत्यादी ठिकाणच्या जैव विविधतेचे व्यवस्थापन (२४०६ २२९५)"** या योजनेकरिता माहे मार्च, २०१७ या महिन्याकरीता उर्वरित निधी रु.३०.००लक्ष वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. विवरणपत्र-१ प्रमाणे निधी वितरणाचा कॅश फ्लो सोबत जोडला आहे.

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. मंजूर निधीचे जिल्हानिहाय वाटप करण्यास महासंचालक, सामाजिक वनीकरण यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यवध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

३. सदर निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदींनुसार व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

४. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर आणि महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत व्हावे.

३. **सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.**

**"मागणी क्र.सी-७, वनीकरण व वन्यजीवन-राज्य योजनांतर्गत योजना, ८००-५०-इतर खर्च-(०२) (०६) इको-टूरीझम (राज्य) (२४०६ २२९५) वनेतर क्षेत्रातील पाणथळे, सरोवरे इ. ठिकाणच्या जैवविविधतेचे व्यवस्थापन".**

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१७/प्र.क.८९ /अर्थ-३, दि.०८.०२.२०१७ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३२३१५३११७०८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.03.23 15:31:38 +05'30'

**(डी. एल. थोरात)**
**सहसचिव (वने), महसूल व वन विभाग**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ),नागपूर.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. मुख्य वनसंरक्षक व उप महासंचालक, सामाजिक वनीकरण वृत्त, कोकण ठाणे, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर .
५. सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग, (सर्व जिल्हे)
६. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई४०० ०३२.
९. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
१०. वित्त विभाग, व्यय-०९, अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
११. कार्यासन अधिकारी, फ-२,फ-७,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. उप सचिव/अवर सचिव (सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. निवडनस्ती/फ-११.

<u>विवरणपत्र -१</u>

**शासन निर्णय क्र.सावविं-२०१६/प्र.क्र.५३/फ-११, दि.२३.०३.२०१७**

**योजनेचे नाव:- "वनेतर क्षेत्रातील पाणथळे, सरोवरे इत्यादी ठिकाणच्या जैव विविधतेचे व्यवस्थापन"**

**मुख्यलेखाशीर्ष:- (२४०६ २२९५)**

**(रु. लाखात)**

| सविस्तर लेखाशीर्ष | प्रस्तावांतर्गत मागणी केलेली रक्कम | मार्च, २०१६ | एकूण |
|---|---|---|---|
| मागणी क्र.सी-७, वनीकरण व वन्यजीवन-राज्य योजनांतर्गत योजना, ८००-५०-इतर खर्च-(०२) (०६) इको-टूरीझम (राज्य) (२४०६ २२९५) वनेतर क्षेत्रातील पाणथळे, सरोवरे इ. ठिकाणच्या जैवविविधतेचे व्यवस्थापन | ३०.०० | ३०.०० | ३०.०० |

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aec c25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.03.23 15:32:13 +05'30'

(डी. एल. थोरात)
सहसचिव (वने), महसूल व वन विभाग